राज्यातील लॉकडाऊन परिस्थितीत निर्माण
झालेल्या अतिरिक्त दूधाचे नियोजन....

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- संकीर्ण- २०२०/प्र.क्र.१/पदुम-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक :- २७ एप्रिल, २०२०.**

**वाचा :-**
१) मा.उप मुख्यमंत्री महोदय यांचे अध्यक्षतेखाली दि. ३१.३.२०२० रोजी झालेली बैठक.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ यांचे पत्र क्र. महानंद/०२/दू.भू.रु. योजना/२०१९-२०/४९९५, दि.२६.३.२०२०.
३) आयुक्त, दुग्धव्यवसाय यांचे पत्र क्र. आदुवि-२१ (ब) दूधाचे योजन/क्र.५/२०२०/१२९९, दि.३०.३.२०२०.
४) शासन समक्रमांकीत दि.३ एप्रिल, २०२० रोजीचा शासन निर्णय.

**प्रस्तावना:-**

कोविड-१९ या रोगाचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी, राज्यात दिनांक १९ मार्च, २०२० पासून लॉकडाऊन घोषित करण्यात आला आहे. सदर लॉकडाऊनमुळे राज्यातील दूधाच्या व दुग्धजन्य पदार्थांच्या मागणीत मोठ्या प्रमाणात घट झाली होती. परिणामी दुग्ध उत्पादक शेतकऱ्यांच्या दूधास योग्य भाव मिळत नसल्याने तसेच दूधाच्या मागणीत घट झाल्याने, संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या (महानंद) या सहकारी दूध संघाच्या शिखर संस्थेमार्फत, राज्यातील अतिरिक्त होणाऱ्या प्रतिदिन १० लक्ष लिटर दूधाचे रुपांतरण दूधभुकटीत करण्याबाबतची योजना शासनाने घोषित केली आहे. सदर योजना संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयात नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून दिनांक ३१.५.२०२० या कालावधीपर्यंत कार्यान्वित करण्यास मान्यता देण्यात आली होती.

वरील शासन निर्णयानुसार योजना प्रत्यक्षात दिनांक ६.४.२०२० या दिनांकापासून कार्यान्वित झाली असून, योजनेंतर्गत दिनांक २३.४.२०२० पर्यंत झालेली दूध स्विकृती व उर्वरित योजनेचा कालावधी विचारात घेता, संपूर्ण योजनेकरिता ४ कोटी लिटर दूधाची स्विकृती व त्यासाठी रु.१२७ कोटी इतक्या रक्कमेस वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार, संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णयात सुधारणा व त्याअनुषंगिक अटी व शर्तींना मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या दिनांक २७.४.२०२० रोजीच्या बैठकीत कार्योत्तर मंजूरीसाठी सादर करण्यात आला होता. मंत्रिमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार दिनांक ३.४.२०२० रोजीच्या शासन निर्णयात आवश्यक सुधारणा करुन सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासनाने संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये घोषित केलेली योजना प्रत्यक्षात दि.६ एप्रिल, २०२० या दिनांकापासून कार्यान्वित झालेली असल्याने योजनेंतर्गत दिनांक २३.४.२०२० पर्यंतची झालेली दूध स्विकृती व योजनेचा उर्वरित कालावधी लक्षात घेता, सदर योजनेंतर्गत एकंदरित ४ कोटी लिटर दूध स्विकृत करण्यास व त्यासाठी रु.१२७ कोटी इतक्या रक्कमेच्या खर्चास शासन या

निर्णयान्वये मान्यता देत आहे. सदर योजना खालीलप्रमाणे नमूद करण्यात आलेल्या सूधारित अटी व शर्तीनुसार राबविण्यात येईल

**<u>अटी व शर्ती :-</u>**

१. सदर योजना व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ (महानंद) यांचेमार्फत राबविण्यात येईल. सदर योजनेअंतर्गत दूध शासन व सहकारी संस्थेमार्फत संकलित केले जाईल.

२. अतिरिक्त स्वरुपात संकलित केल्या जाणाऱ्या दूधाच्या गुणप्रतीनुसार दूध उत्पादकांना सहकारी दूध संघांनी दूध खरेदी दर दिल्यावर खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार सदर रकमेची प्रतिपूर्ती महासंघामार्फत संबंधित सहकारी दूध संघांना करण्यात येईल :-

| फॅट/एसएनएफ | ८.३ | ८.४ | ८.५ |
|---|---|---|---|
| ३.२ | रु.२२.१० | रु.२३.१० | रु.२४.१० |
| ३.३ | रु.२२.४० | रु.२३.४० | रु.२४.४० |
| ३.४ | रु.२२.७० | रु.२३.७० | रु.२४.७० |
| ३.५ | रु.२३.०० | रु.२४.०० | रु.२५.०० |

३.५/८.५ प्रोटिन २.९ या गुणप्रतीपेक्षा अधिकच्या दूधाकरीता प्रती फॅट व एसएनएफ साठी प्रचलित शासन धोरणानुसार अधिकचा दर देण्यात येईल.

३. शासनाने यापूर्वी दि.२० जूलै, २०१८ व दि.३१ जूलै, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये दूधासाठी प्रतिलिटर रु.५/- अनुदान देण्याची योजना आयसीआयसीआय बँकेच्या संगणकीय प्रणालीमार्फत राबविली आहे. सदर योजनेतील अनुभव लक्षात घेता, प्रस्तुत योजनासुध्दा आयसीआयसीआय बँकेच्या संगणकीय प्रणालीमार्फत राबविण्यात येऊन त्यासाठी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ यांनी या योजनेच्या अंमलबजावणीसाठी आयसीआयसीआय बँकेत स्वतंत्र चालू खाते उघडावे. यासाठी आयसीआयसीआय बँकेसोबत आवश्यक तो करारनामा करावा.

४. सहकारी दूध संघांनी दूध उत्पादक शेतकऱ्यांना वरील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे दूधासाठी प्र.लि.दूध खरेदी दर दिला असून, सदर रक्कम दूध उत्पादकांच्या खात्यावर जमा झाली आहे असा तपशिल प्रमाणपत्रासह संगणकीय प्रणालीमध्ये उपलब्ध करुन दिल्यावर तसेच सहकारी दूध संघांनी दूध उत्पादकांना वरील तक्त्यातील गुणप्रतीनुसार दूध खरेदी दर दिला आहे याची खातरजमा संबंधित जिल्ह्यातील जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी/ प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांनी प्रमाणित केल्यावर, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ (महानंद) यांनी, आयसीआयसीआय बँकेत या योजनेसाठी उघडलेल्या खात्यातून प्रतिपूर्तीच्या स्वरुपात संबंधित सहकारी दूध संघांना रक्कम वितरित करावी.

५. दूध संकलनाकरीता तालुका/जिल्हा दूध संघांना शासन दराप्रमाणे वरकड खर्च वाहतुकीसह शासनाच्या दराने अदा करण्यात येईल.

६. ज्या ठिकाणाहुन अतिरिक्त दूध संकलित केले जाईल असे दूध वाहतुकीच्या दृष्टीने नजीकच्या दूधभूकटी निर्मीती प्रकल्पाकडे रुपांतरणासाठी देण्यात येईल.

७. व्यवस्थापकीय संचालक, महानंद यांनी अतिरिक्त स्वरुपात संकलित केल्या जाणाऱ्या दूधाचे ठिकाण व रुपांतरण करण्यासाठी निश्चित केलेल्या दुधभूकटी निर्मिती प्रकल्प यांचा तपशिल प्राप्त करुन संबंधितांबरोबर करार करणे आवश्यक आहे.

८. दूध संकलनाच्या वेळी आणि दूध रुपांतरीत झाल्यानंतर दूध भुकटी व लोण्याची प्रत BIS मानकांप्रमाणे असेल याची खातरजमा संबंधित जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी/ प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांच्यामार्फत करण्यात येईल.

९. अतिरिक्त स्वरुपात संकलित केलेल्या दूधापासून रुपांतरीत होणाऱ्या दूधभुकटीचे प्रमाण हे किमान ९७ % असावे.

१०. दूधभुकटी व लोणी तयार झाल्यानंतर त्याचा ताबा संबंधित प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांनी घ्यावा. तसेच सदर दूधभुकटी व लोणी ही BIS मानकाप्रमाणे असेल याची खात्री करावी.

११. सदर दूधभुकटी व लोणी शासनाच्या ताब्यात आल्यावर त्याची साठवणूक वखार महामंडळाच्या गोडावूनमध्ये करण्यात यावी. सदर ठिकाणी जागा उपलब्ध नसल्यास नजीकच्या खाजगी गोदाम व शीतगृहामध्ये त्याची साठवणूक करण्यात यावी. यासाठी महाराष्ट्र राज्य वखार महामंडळाने निश्चित केलेल्या प्रचलित दराने शुल्क देणे व शासकीय दराने वाहतूक खर्च देणे अनुज्ञेय राहील.

१२. सदर दूधभुकटी व लोणी ताब्यात आल्यावर त्याबाबतची माहिती संबंधित प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी यांनी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या. यांना दिल्यावर संबंधित प्रकल्पांना रुपांतरणाचा खर्च दूध महासंघाकडून अदा करण्यात येईल.

१३. सदर योजनेअंतर्गत होणाऱ्या एकूण जमाखर्चावर महाराष्ट्र राज्य दूध महासंघास किमान १% सेवाशुल्क अनुज्ञेय राहील. या योजनेमध्ये राज्यशासनास अधिकचा नफा झाल्यास विक्रीपोटी प्राप्त झालेल्या रकमेच्या १% शुल्क दूध महासंघाला प्रोत्साहनपर निधी म्हणून देण्यात येईल.

१४. रुपांतरण संस्था/प्रकल्प यांनी उत्पादित पदार्थांच्या सुरक्षेचे हमीपत्र/बंधपत्र महासंघास देणे आवश्यक राहील.

१५. या योजनेमध्ये कोणत्याही संस्थेमार्फत अनियमितता झाल्याचे आढळून आल्यास अशा संस्था अपात्र ठरवल्या जातील, तसेच त्यांना वितरित केलेले अनुदान व्याजासहित वसूल करण्यात येईल. अनियमिततेबाबत कायदेशीर कारवाईही करण्यात येईल.

१६. शासनाने दूधभुकटीसाठी रुपांतरणाकरिता दिनांक १९.१.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये पॅकिंग मटेरियल व जीएसटीसह रु.२३.४८ प्रति किलो व लोण्याकरीता रु.१२.२७ प्रति किलो पॅकिंग मटेरियल व जीएसटीसह मंजूर केला आहे. सदर दर जानेवारी, २०१८ रोजीचे असून साधारणत: यामध्ये वार्षिक १० % अशी वाढ धरल्यास दूधभुकटी व लोण्याकरीता अनुक्रमे रु.२८.१७ व रु.१४.७२ असा अधिकचा खर्च येतो. सदर वस्तुस्थिती लक्षात घेऊन दि. ३.४.२०२० रोजीच्या शासन निर्णयामध्ये दूधभुकटी रुपांतरणाकरीता जीएसटीसह रु.२५/- प्रतिकिलो असा खर्च अनुज्ञेय करण्यात आला आहे.

१७. मात्र, दूधभुकटी रुपांतरण होतांना लोणीसुध्दा निर्मीत होत असल्याने लोण्यासाठी प्रतिकिलो रु.१५/- असा खर्च वरील मुद्दा क्र. १६ लक्षात घेऊन निश्चित करणे आवश्यक आहे. त्यामुळे सदर योजनेअंतर्गत दूधभुकटी रुपांतरणाकरीता पॅकिंग मटेरियल व जीएसटीसह प्रतिकिलो रु. २५/- व लोण्याकरीता पॅकिंग मटेरियल व जीएसटीसह पूर्णांकात रु.१५/- असा खर्च निश्चित करण्यात आला आहे.

१८. वरीलप्रमाणे निश्चित करण्यात आलेल्या दराप्रमाणे राज्यातील जे दुधभुकटी प्रकल्पधारक दूध भुकटी व लोण्याचे रुपांतरण करुन देण्यास तयार असतील, अशा दुग्धभुकटी प्रकल्पधारकांची लेखी सहमती प्राप्त झाल्यावर महासंघाने संबंधितांबरोबर करारनामा करावा. तदनंतर अशा प्रकल्पधारकांना सदरचे काम महासंघाने शक्यतो प्रो-राटा तत्वावर द्यावे.

१९. कोविड-१९ या रोगाच्या ओढावलेल्या आपत्तीत ई-टेंडरिंगव्दारे दूधभुकटी व लोण्याच्या रुपांतरणासाठी दरपत्रक मागवून तद्नंतर येणाऱ्या दरानुसार दूधभुकटी प्रकल्प निश्चित करणे या बाबीसाठी विलंब होईल हे लक्षात घेऊन, शासनाने वरील नमूद मुद्दा क्र. १६ व १७ मध्ये निश्चित केलेल्या दरानुसार प्रतिकिलो दूधभुकटी व लोणी रुपांतरणासाठीचे दर या योजनेसाठी निश्चित केले आहेत.

२०. सदर वस्तुस्थिती लक्षात घेता, अतिरिक्त दूधाचे रुपांतरणाकरीता दूधभुकटी प्रकल्पांना पॅकेजिंग व जीएसटीसह रु.२५/- प्रतिकिलो व लोण्यासाठी पॅकेजिंग व जीएसटीसह रु.१५/- या दराने खर्च देणे अनुज्ञेय राहील.

२१. रुपांतरण संस्था/प्रकल्प यांनी भूकटीप्रकल्पात बिघाड झाल्यास त्याबाबतची सूचना संबंधित रुपांतरण संस्था/प्रकल्पाने व्यवस्थापकीय संचालक, महानंद यांना द्यावी. अशाप्रकारची सूचना प्राप्त होण्यापूर्वी जे दूध रुपांतरणासाठी पाठविले असेल व ते प्रकल्पांच्या ठिकाणी पोहोचले असेल असे दूध रुपांतरणासाठी स्वीकारणे रुपांतरण संस्था/प्रकल्पास बंधनकारक राहील.

२२. सदर योजनेची अंमलबजावणी योग्यरीत्या होण्यासाठी आयुक्त, दुग्धव्यवसाय यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती नियुक्त करण्यात येईल. या समितीत व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ, महाव्यवस्थापक (वित्त), महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ, उप आयुक्त (प्र व वि), दुग्धव्यवसाय हे सदस्य राहतील. सदर समितीचे सदस्य सचिव हे महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघाचे दुग्धशाळा व्यवस्थापक हे राहतील.

२३. सदर समिती, सहकारी दूध संघाकडून केले जाणारे दूध संकलन/रुपांतरण प्रकल्प , वाहतुकीचे दर/ गोडावूनचे दर निश्चित करणे व इतर अनुषंगिक बाबींसंदर्भात निर्णय घेईल व त्यास शासनाच्या मान्यतेसाठी प्रस्ताव सादर करेल. अतिरिक्त स्वरुपात संकलित झालेल्या दूधापासून निर्माण झालेल्या दूधभुकटी व लोणीची विक्री NCDFI च्या पोर्टलवर करण्यासाठी निर्णय घेऊन शासनाच्या मान्यतेसाठी प्रस्ताव सादर करेल.

२४. अतिरिक्त दूधाद्वारे रुपांतरित होणारी दूध भुकटी तसेच लोणी NCDFI च्या पोर्टलवर विक्रीसाठी उपलब्ध करुन देताना लागणाऱ्या सेवाशुल्कापोटी विक्री रक्कमेच्या ०.३% इतका खर्च करणे अनुज्ञेय राहील.

उपरोक्त योजनेकरिता होणारा खर्च "मागणी क्र.डी-५, २४०४-दुग्धव्यवसाय विकास ००, १०२, दुग्धव्यवसाय प्रकल्प, (०५) दूध व दूध भुकटी करिता अनुदान, (०५) (०१) - अतिरिक्त दूधाचे रुपांतर व निर्यात करिता अनुदान, ३३-अर्थसहाय्य, (२४०४ ४१११)" या लेखाशीर्षाखाली सदर योजनेकरिता आकस्मिकता निधीद्वारे उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर योजनेअंतर्गत निधीचा विनियोग करण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या. मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व महाव्यवस्थापक (वित्त) ,महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या.मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००४२८११४३२२७८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajesh Shaligram Govil

Digitally signed by Rajesh Shaligram Govil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c549410b2251df8c92783a2da17afcacbe7f8fe3a4fd88f156fea84433871f11, serialNumber=3cec7a5cf8d124a0d8e15bfc85a782c01ef27eaee8bedaba4dce3416562097ac, cn=Rajesh Shaligram Govil
Date: 2020.04.28 12:28:18 +05'30'

**( राजेश गोविल )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव (नियोजन) मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग, वरळी, मुंबई.
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या, मुंबई.
११) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञयता व लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
१२) अधिदान व लेखाधिकारी, बांद्रा, मुंबई.
१३) निवासी व लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
१४) सर्व प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१६) वित्त विभाग (व्यय-२, अर्थसंकल्प-१५), मंत्रालय, मुंबई.
१७) कक्ष अधिकारी (पदुम-१६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई.
१८) निवडनस्ती, पदुम-८